## वनस्पतिशास्त्र परिभाषा उपसमिती

**अध्यक्ष**

डॉ. वि. रा. ज्ञानसागर, नागपूर विद्यापीठ

**सदस्य**

श्री. श. मो. करमरकर, मुंबई विद्यापीठ

श्री. म. वा. मिराशी, नागपूर विद्यापीठ

डॉ. शं. र. देशपांडे, पुणे विद्यापीठ

डॉ. के. ब. देशपांडे, मराठवाडा विद्यापीठ

डॉ. वा. द. वर्तक, मराठी विज्ञान परिषद

प्रा. ना. बा. तारे, शिवाजी विद्यापीठ

**सदस्य-सचिव**

श्री. शं. ना. नवरे, भाषा उपसंचालक

## प्राणिशास्त्र परिभाषा उपसमिती

**अध्यक्ष**

डॉ. दि. दा. नरवणे, मराठवाडा विद्यापीठ

**सदस्य**

प्रा. मा. ग. ढवळे, मुंबई विद्यापीठ

डॉ. दे. ना. कामत, शिवाजी विद्यापीठ

प्रा. रा. वि. सोवनी, मराठी विज्ञान परिषद

डॉ. द. र. रानडे, पुणे विद्यापीठ

डॉ. वि. के. ठाकरे, नागपूर विद्यापीठ

**सदस्य-सचिव**

श्री. शं. ना. नवरे, भाषा उपसंचालक

# प्रस्तावना

महाराष्ट्र राज्याच्या निर्मितीनंतर मराठी भाषेला राजभाषेचे स्थान मिळाले. साहजिकच महाराष्ट्रातील सर्व विद्यापीठांमध्ये शिक्षणाचे माध्यम मराठी असावे हेही सर्वमान्य झाले. शिक्षणक्षेत्रातील माध्यमाचे हे परिवर्तन कार्यक्षमतेने घडवून आणण्यात मुख्यत्वेकरून दोन अडचणी होत्या.

पहिली अडचण म्हणजे तांत्रिक विद्याशाखांसाठी आवश्यक असलेला पारिभाषिक शब्दसंग्रह हाताशी नव्हता. दुसरे असे की, या विद्याशाखांतील विविध विषय शिकवण्याकरिता आवश्यक असलेली पाठ्यपुस्तके व संदर्भ पुस्तके लिहिली गेली नव्हती. काही विद्यापीठांनी यादृष्टीने प्रयत्न केले होते. परंतु ते त्यांच्यापुरते व मर्यादित स्वरूपात होते. सर्व विद्यापीठांतून समान आणि एकरूप परिभाषा वापरली जावी, यासाठी शासनाने पुढाकार घेणे आवश्यक होते.

या सर्व गोष्टींचा सांगोपांग विचार करण्यासाठी महाराष्ट्रातील सर्व विद्यापीठांचे कुलगुरू व भाषा सल्लागार मंडळाचे सदस्य यांची एक संयुक्त बैठक ऑक्टोबर १९६७ मध्ये कोल्हापूर येथे शासनातर्फे आयोजित करण्यात आली. या बैठकीत भाषा संचालनालयाने विद्यापीठांतून शिकवल्या जाणाऱ्या सर्व विज्ञानविषयक व मानवविद्याविषयक विषयांची परिभाषा सर्व विद्यापीठांच्या सहकार्याने तयार करावी असे ठरले. संदर्भ ग्रंथांच्या व क्रमिक पुस्तकांच्या निर्मितीचे काम महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ आणि महाराष्ट्र राज्य विद्यापीठ ग्रंथनिर्मिती मंडळ या संस्थांनी हाती घेतले.

वरील निर्णयाच्या अनुरोधाने भाषा संचालनालयाने शास्त्रीय व मानविकी विद्याशाखांतील भौतिक, रसायन, गणित, अभियांत्रिकी यांसारख्या काही मूलभूत विषयांच्या उपसमित्या प्रथम स्थापन करून व काही निदेशक तत्त्वे ठरवून या कामाला सुरूवात केली. या उपसमित्यांवर सर्व विद्यापीठांचे प्रतिनिधी व मराठी विज्ञान परिषदेसारख्या संस्थांचे प्रतिनिधी, सदस्य म्हणून नेमण्यात आले. परिभाषानिर्मितीचे हे नवे काम अर्थातच सुरूवातीला अत्यंत कठीण असे होते. शिवाय, ही परिभाषा केवळ प्रादेशिक स्तरापुरतीच मर्यादित न राहता अन्य भारतीय भाषांनाही ती स्वीकार्य होऊन अखिल भारतीय स्तरावरही तिचा वापर होईल, हा दृष्टीकोन ठेवणेही आवश्यक होते. त्यामुळे ही परिभाषा केंद्र सरकारने तयार केलेल्या परिभाषेशी मराठी भाषेच्या प्रकृतीला बाधा येणार नाही, अशाप्रकारे मिळतीजुळती असावी असेही सर्वसाधारण धोरण होते. या शब्दनिर्मितीकरिता मराठी भाषेत तोपर्यंत तयार झालेल्या इतर शास्त्रीय विषयांवरील शब्दकोशांचाही उपयोग करण्यात आला.

आतापर्यंत भाषा संचालनालयाने गणित, रसायन, समाज, वाणिज्य, तत्त्वज्ञान व तर्कशास्त्र, ग्रंथालय, शारीर, भूशास्त्र, भौतिकशास्त्र, शिक्षणशास्त्र, यंत्र अभियांत्रिकी, स्थापत्य अभियांत्रिकी, विद्युत अभियांत्रिकी व कृषिशास्त्र या विषयांवरील परिभाषा कोश प्रसिद्ध केले आहेत. तसेच, अर्थशास्त्र, राज्यशास्त्र, धातुशास्त्र, भूगोल, शरीरक्रिया, भाषाशास्त्र व साहित्य समीक्षा या विषयांचे कोशविषयक काम पूर्ण झाले असून तेही कोश यथावकाश प्रसिद्ध करण्यात येत आहेत. प्रस्तुत जीवशास्त्र परिभाषा कोश हा या प्रकल्पातील एक टप्पा आहे.

वनस्पतिशास्त्र व प्राणिशास्त्र परिभाषा निर्मितीचे काम भाषा संचालनालयाने या विषयांच्या दोन स्वतंत्र उपसमित्या नेमून हाती घेतले होते. महाराष्ट्रातील विद्यापीठे व मराठी विज्ञान परिषद यांनी शिफारस केलेल्या तज्ञ व्यक्तींच्या सहाय्याने हे काम करण्यात आले. वनस्पतिशास्त्र उपसमितीच्या एकूण ९१ बैठकी व प्राणिशास्त्र उपसमितीच्या एकूण ९४ बैठकी घेण्यात आल्या आणि या दोन्ही उपसमित्यांनी सुमारे २५,५०० इंग्रजी पारिभाषिक संज्ञांचे मराठी पर्याय निश्चित केले. प्रस्तुत कोश मुद्रणावस्थेत असताना वनस्पतिशास्त्र उपसमितीचे सदस्य, श्री. ना. बा. तारे व श्री. म. वा. मिराशी यांचे शोचनीय निधन झाले. हा कोश मुद्रित स्वरूपात पाहण्यासाठी ते आमच्यात नाहीत याबद्दल अतीव दु:ख वाटते.

या दोन विषयांचे दोन वेगवेगळे कोश तयार करण्यापेक्षा या पारिभाषिक संज्ञांचे एकत्रित संकलन करून जीवशास्त्राचा हा एकच कोश आता तयार करण्यात आला आहे. परिभाषेची उपयुक्तता प्रत्यक्ष वापराने सिद्ध होत असल्याने कालांतरानेच तिचे मूल्यमापन होऊ शकेल.

अनेक तज्ञ व मान्यवर व्यक्तींच्या सहकार्याने तयार झालेला हा कोश या क्षेत्रातील प्राध्यापक, लेखक व विद्यार्थी यांना तसेच या विषयाची आस्था असणाऱ्या अन्य व्यक्तींना व सर्व संबंधित शासकीय विभागांना उपयुक्त व मार्गदर्शक ठरेल असा विश्वास वाटतो.

न. ब. पाटील
भाषा संचालक
महाराष्ट्र राज्य

# जीवशास्त्र परिभाषा कोश

कोणताही विषय मातृभाषेच्या माध्यमातून अधिक चांगला समजतो, समजावून दिला जाऊ शकतो हे जवळजवळ सर्व शिक्षणतज्ञांनी मान्य केले आहे. विद्यार्थ्यांना केवळ विषय समजण्यापुरतेच नव्हे तर त्यावरील आपले विचार व्यक्त करण्यासही मातृभाषेचे माध्यम अधिक उपयुक्त ठरते. नोबेल पारितोषिकाचे मानकरी आणि विख्यात वैज्ञानिक डॉ. इर्विन श्रॉडिंजर यांच्या मते, "भाषेच्या अडचणी यःकश्चित नाहीत. स्वतःची भाषा शरीरावर नीटनेटक्या बसणाऱ्या कपड्याप्रमाणे असते. असा कपडा नसला तर मनुष्य अस्वस्थ होतो. परकीय भाषेमुळे तो स्वस्थ राहू शकत नाही". यावरून मातृभाषेच्या माध्यमाची महत्ता वेगळी सांगावयास नको.

गेल्या पन्नास-साठ वर्षांत ज्ञानाची वाढ इतक्या झपाट्याने होत आहे, ज्ञानाच्या कक्षा इतक्या वेगाने विस्तारत आहेत की ते विचार, ते प्रयोग शब्दबद्ध करणे इंग्रजी भाषेलाही कठीण जात आहे. तरीसुद्धा इंग्रजी भाषेमध्ये तितक्याच वेगाने नवीन शब्दांची भर घातली जात आहे, नवीन विचार जनसामान्यांपर्यंत आणि त्या त्या विषयाच्या तज्ञांपर्यंत तत्परतेने पोचविण्याचे प्रयत्न केले जात आहेत. मराठी भाषा भारतातील एक प्रगल्भ भाषा आहे. ऐतिहासिक कालातील मराठी आणि आजचे मराठी यांत बरेच अंतर पडले आहे. याचाच अर्थ ज्ञान-विज्ञानातील नवनवीन संकल्पना व्यक्त करण्याची मराठीची क्षमता सातत्याने वाढवली जात आहे. समाजशास्त्र, अर्थशास्त्र, तत्त्वज्ञान वगैरे शास्त्रांमध्ये मराठीचा वापर फार मोठ्या प्रमाणात होत असला तरी भौतिक, रसायन, वनस्पती, स्थापत्य, वैद्यक इत्यादी वैज्ञानिक व तांत्रिक विषयांची शब्दसंपत्ती मात्र तेवढ्या प्रमाणात वाढलेली नाही. ही परिभाषा सहजासहजी उपलब्ध होणारीही नाही. एकतर इंग्रजी तांत्रिक शब्द जसेच्या तसे घ्यावे लागतील किंवा व्याकरणातील शब्दसिद्धींच्या नियमांच्या आधारे नवीन शब्द तयार करावे लागतील. भारतीय वैद्यकात वनस्पतींना अतिशय महत्त्व आहे. त्याविषयीची बरीचशी परिभाषा बहुतेक भारतीय भाषांमध्ये वैद्यकीय संस्कृत ग्रंथातूनच घेण्यात आली आहे. वनस्पतिशास्त्राच्या परिभाषा निर्मितीत अशा शब्दांचा आवश्यक तेथे उपयोग करण्यात आला आहे. वनस्पतिशास्त्रातील इंग्रजी परिभाषा, लॅटीन आणि ग्रीक या प्राचीन भाषांवर आधारलेली असल्यामुळे आणि भारतीय विद्यार्थ्यांना त्यांचा गंधही नसल्यामुळे, ती त्यांना अर्थ न समजता मुखोद्गत करावी लागते. पण संस्कृताधीष्ठित परिभाषेच्या बाबतीत अशी स्थिती नाही. उदा. corolla या शब्दाचा मूळ अर्थ सुरूवातीला कळणे कठीणच आहे. पण त्याच्या "दलपुंज" या पर्यायावरून थोडा अर्थबोध झाल्याशिवाय राहत नाही. "दल" म्हणजे "पाकळी" आणि पाकळ्यांचा समुदाय म्हणजे "दलपुंज" हे ताबडतोब समजते व

या शब्दाचा संबंध फुलाशी आहे हे कळते. पारिभाषिक शब्द तयार करताना तो सार्थ व शक्यतोवर छोटा असावा पण दुर्बोध नसावा अशी काळजी घेण्यात आली आहे. उदा. vacuole हा शब्द vacuum या शब्दावर आधारित आहे. तो वास्तविक वातरहित नाही. पण पेशी रसाच्या दृष्टीने vacuole रिकामे आहे म्हणून "रिक्तिका" हा सार्थ शब्द तयार करण्यात आला. mitochondrion हा शब्द केंद्र सरकारच्या कोशात तसाच घेण्यात आला आहे. उपसमितीला या शब्दाचा मराठी पर्याय देणे जरूरीचे वाटले. mitos म्हणजे तंतू. म्हणून त्यांच्या आधारे "तंतुणिका" हा शब्द तयार करण्यात आला. अशाचप्रकारे carpel— अण्डप, cork— त्वक्षा हे पर्याय स्वीकारण्यात आले.

जीवशास्त्रीय परिभाषेच्या बाबतीतील स्थितीसुद्धा यापेक्षा वेगळी नाही. इंग्रजी जीवशास्त्रीय परिभाषा बहुतेक लॅटिन व ग्रीकपासूनच बनलेली असल्यामुळे इंग्रजी भाषिकांना देखील तिचा बोजडपणा व दुर्बोधता जाणवते. तो बोजडपणा प्रस्तुत कोशामध्ये येऊ नये याकरता प्रयत्न केले आहेत. उदा. abducens (nerve) या शब्दाला प्रस्तुत कोशात अपवर्तनी (चेता), abductor (muscle) या शब्दाला अपवर्ती (स्नायू) असे पर्याय घेतले आहेत. मराठी माध्यमातून शिक्षण घेतलेल्या विद्यार्थ्यांना किंवा इतर मराठी भाषिकांना हे पर्याय अर्थपूर्ण वाटावेत अशी अपेक्षा आहे.

इंग्रजीमधील काही शब्द संशोधकांनी संशोधनाच्या वेळी जसे वापरले तसेच प्रचारात आले आहेत. उदा. chromosome-coloured thread. अर्थाच्या दृष्टीने रंगीत धागा असा पर्याय मूळ शब्दामध्ये अभिप्रेत असलेल्या विचाराशी अगर वस्तुस्थितीशी अजिबात जुळणारा नाही. म्हणून प्रस्तुत कोशात "गुणसूत्र" हा पर्याय योजिला आहे. मूळ कल्पनेचा गाभा कायम ठेवून अर्थ स्पष्ट करण्यासाठी त्यावर मराठीचा संस्कार केला आहे.

या कोशात दिलेले पर्याय कायम स्वरूपाचे आहेत असा मुळीच दावा नाही. काही शब्द राहतील. काही कालांतराने जातील. त्याऐवजी नवीन व अधिक सुटसुटीत शब्द वापरात येतील. हे प्रयोग अखंड चालू राहिल्यानेच भाषा समृद्ध बनत जाईल. "प्रेक्षक" की "दर्शक", "सचिवालय" की "मंत्रालय" अशासारखे वाद चालू राहतील. किंबहुना ते चालू राहणे हे भाषेच्या जिवंतपणाचेच एक लक्षण आहे.

निरनिराळ्या विषयांना अनुरूप असा भाषेचा एक आकृतिबंध तयार होत असतो. तिची एक शैली आकार घेत असते. विशिष्ट शास्त्रीय विषयांच्या लेखकांवर अशी शैली निर्माण करण्याची जबाबदारी आहे. वनस्पतिशास्त्रातील निरनिराळ्या शाखांशी संबंधित पुस्तके लिहिणाऱ्या लेखकांना प्रस्तुत कोश नुसता उपयुक्तच ठरणार नाही तर त्यातील

शब्दांच्या अनुषंगाने विशिष्ट मराठी शैलीही उत्क्रांत होण्यास मदत होईल असा विश्वास वाटतो.

परिभाषा निर्मितीच्या या कामामध्ये बैठकींच्या वेळी उपसमितीचे सदस्य, भाषा संचालनालयातील अधिकारीवर्ग व कर्मचारी आणि संस्कृत तज्ज्ञ यांनी जे बहुमोल सहकार्य दिले त्याबद्दल आम्ही त्या सर्वांचे आभारी आहोत.

**दि. दा. नरवणे**
अध्यक्ष, प्राणिशास्त्र उपसमिती

**वि. रा. ज्ञानसागर**
अध्यक्ष, वनस्पतिशास्त्र उपसमिती

# कोश परिचय

## कोशाची रचना पुढीलप्रमाणे आहे :—

इंग्रजी शब्द व शब्दानुक्रम :—इंग्रजी शब्द देताना मुख्यत्वेकरून Chambers Technical Dictionary व Webster's New International Dictionary यांचा, तसेच या विषयाशी संबंधित असलेल्या अन्य कोशांचा वर्णलेखन (spelling) इत्यादींसाठी आधार घेतला आहे.

इंग्रजी शब्दजाती :—प्रत्येक एकेरी संज्ञेपुढे तिची शब्दजाती दर्शविली आहे. (जसे :—*n.*; *adj.*; *v.t.*; *v.i.* इ.) इंग्रजी दोन किंवा अधिक शब्द असलेल्या संज्ञेपुढे शब्दजाती दर्शविलेली नाही.

विषयनिर्देशक संक्षेप :—एखादी इंग्रजी पारिभाषिक संज्ञा विशिष्ट पोटविषयाशी संबंधित असेल तर पर्याय देण्यापूर्वी तो विवक्षित विषय दर्शविणारा संक्षेप इंग्रजी इटॅलिक मुद्राक्षरात दिला आहे.

पर्याय, अर्थच्छटा, स्पष्टीकरणे :—इंग्रजी संज्ञेपुढे शब्दजाती, विषयनिर्देशक संक्षेप (असल्यास) दिल्यानंतर तिचे एक किंवा अधिक मराठी पर्याय दिले आहेत. पर्याय देताना वेगवेगळ्या अर्थच्छटा असल्यास त्यांना क्रमांक दिले आहेत. काही ठिकाणी अर्थ अधिक स्पष्ट व्हावा म्हणून पर्यायापूर्वी कंसात इंग्रजी स्पष्टीकरण दिले आहे किंवा काही ठिकाणी पर्यायानंतर कंसात मराठी स्पष्टीकरणही दिले आहे. पर्यायांचा वापर यथार्थपणे व्हावा यासाठी आवश्यक तेथे कंसात "as in :" असे देऊन त्या पर्यायाचा उपयोग करून दाखवला आहे.

मराठी शब्दजाती :—इंग्रजी संज्ञेपुढे शब्दजाती दर्शविली असल्याने व त्यानुसार मराठी पर्याय घेतला असल्याने मराठी शब्दजाती वेगळी दर्शविली नाही.

लिंगनिर्देश :—(१) प्रत्येक मराठी एकेरी पर्यायापुढे तो नाम असल्यास लिंगनिर्देश केला आहे. (२) इंग्रजी संज्ञा एकेरी असल्यास तिच्या जोडशब्द असलेल्या मराठी पर्यायापुढे लिंगनिर्देश केला आहे.

शब्दकुळे :—शब्दकुळांतील शब्दांची आधारभूत कल्पना एकच असते, परंतु त्यांतील शब्द सूक्ष्म अर्थच्छटा व्यक्त करून आपली भिन्नता दर्शवितात. असे शब्द त्यातल्या महत्त्वाच्या शब्दाखाली पर्यायानंतर *cf.* असे दर्शवून एकत्रितपणे दिले आहेत. तसेच त्या शब्दकुळातील शब्द, कोशात त्यांच्या वर्णक्रमानुसार योग्य त्या ठिकाणी दिले आहेत व तिथे *cf.* असे म्हणून ज्या इंग्रजी संज्ञेखाली हे कूळ आले आहे त्या इंग्रजी संज्ञेचा निर्देश केला आहे. उदा. पृष्ठ ३ वरील

absorption हे कूळ पहावे. अशा तऱ्हेने शब्दकुळाखाली सर्व शब्द एकत्र आणण्याच्या या पद्धतीचा अभ्यासकांना उपयोग होऊ शकेल.

जोडसंज्ञा :—काही महत्त्वाच्या पारिभाषिक जोडसंज्ञांखाली या संज्ञांतील इतर महत्त्वाचे प्रकार दर्शविणाऱ्या संज्ञा एकत्र आणल्या आहेत. उदा. पृष्ठ ४९ वरील axis ही संज्ञा पहावी. याही पद्धतीचा अभ्यासकांना उपयोग होऊ शकेल.

दुसरे असे की प्रस्तुत जीवशास्त्रात येणाऱ्या artery, vein इ. पारिभाषिक संज्ञांखालीच महत्त्वाच्या सर्व धमन्या (arteries) अथवा शिरा (veins) एकत्रितपणे दिलेल्या आहेत. याप्रमाणे एकत्रितपणे दिलेल्या पारिभाषिक संज्ञांची यादी सोबत दिलेली आहे.

समानार्थी शब्द :—काही इंग्रजी शब्द जवळजवळ समानार्थी असल्याने त्यांना मराठी पर्याय देताना हे शब्द समानार्थी आहेत हे दर्शविण्यासाठी एकाच ठिकाणी दिले आहेत. ज्या शब्दासमोर पर्याय दिला आहे त्या शब्दासमोर कंसात (*also*) असे देऊन दुसरा समानार्थी शब्द दर्शविला आहे व कंसातील शब्द त्याच्या वर्णक्रमानुसार ज्या ठिकाणी आला असेल त्या ठिकाणी त्या शब्दासमोर (=) अशी खूण दर्शवून पर्याय ज्या शब्दासमोर दिला आहे तो शब्द दर्शविला आहे. त्याचप्रमाणे इंग्रजी शब्दाच्या वर्णलेखनात (spelling) थोडा फेरफार असलेले इंग्रजी शब्दही वरील पद्धतीनेच दर्शविण्यात आले आहेत.

(ड) वनस्पतिशास्त्र, प्राणिशास्त्र, भूशास्त्र इत्यादींसारख्या शास्त्रीय विषयांमधील द्विपद नामसंज्ञा.

(इ) रेडिओ, पेट्रोल, रडार, इलेक्ट्रॉन, न्यूट्रॉन, प्रोटॉन यांसारखे नवीन शब्द.

(फ) गणित व इतर शास्त्रांमध्ये वापरण्यात येणारे संख्यांक, संकेतचिन्हे, सूत्रे वगैरे.

जसे.——Sin., Cos., Tan., Log.

तथापि, वर निर्दिष्ट केलेल्या पारिभाषिक संज्ञांपैकी पुष्कळशा संज्ञांना मराठीत योग्य पर्याय असून ते शाळा व महाविद्यालये इत्यादींत कित्येक वर्षांपासून रूढ झाले आहेत.

जसे.——ऑक्सिजन–प्राणवायु, कॅलरी–ऊष्मांक, Sin.–ज्या, Cos.–कोज्या वगैरे. तेव्हा आंतरराष्ट्रीय संज्ञा त्यांच्या इंग्रजी स्वरूपात जशाच्या तशा लिप्यंतरित करून देताना त्याबरोबरच त्या संज्ञांना मराठीत रूढ असलेले पर्याय देखील द्यावेत.

३. जी संकेतचिन्हे असतील ती त्यांच्या आंतरराष्ट्रीय स्वरूपातच राहू द्यावीत. तथापि संज्ञांचे संक्षेप देवनागरी लिपीतून दर्शवावेत. "cm" म्हणजे "सेंटिमीटर" या संज्ञेचा संक्षेप सें. मी. असा देवनागरी लिपीत द्यावा.

४. वैज्ञानिक व तांत्रिक पारिभाषिक शब्दांसाठी पर्यायांची निश्चिती करताना, अर्थाची निश्चितता व सुबोधता यावर अधिक भर द्यावा व मराठी भाषेच्या प्रकृतीशी अविरोधी असे व शक्यतोवर भारतीय भाषांत वापरता येतील असेच पर्याय निवडावेत.

५. विवक्षित वैज्ञानिक शब्दांसाठी जे देशीय पर्याय मराठी भाषेत प्रचलित आहेत ते आणि सर्वसाधारणपणे वापरण्यात येणारे पर्याय तसेच राहू द्यावेत.

६. विदेशी भाषांमधील जे शब्द मराठी भाषेत प्रचलित आहेत ते तसेच ठेवावेत. जसे.——मशीन, इंजिन, मीटर, लिटर, वगैरे.

७. हे पर्याय मराठी व्याकरणानुसार प्रातिपदिक रूपात द्यावेत.

८. **मिश्र शब्दांची निर्मिती.**——वैज्ञानिक परिभाषा तयार करताना Pasteurisation "पाश्चरीकरण", Voltage "व्होल्टता" अशांसारखे मिश्र शब्द बनवणे हे भाषेच्या स्वाभाविक प्रवृत्तीस अनुसरून असल्यामुळे गरजेनुसार असे शब्द तयार करावेत.

९. जरूर तेथे समान अर्थी पारिभाषिक शब्दांची कुळे लक्षात घेऊन मराठी पारिभाषिक शब्द निश्चित करावेत.

# संक्षेपसूची

| | | |
|---|---|---|
| *abbr.* | .. | abbreviation |
| *adj.* | .. | adjective |
| *adv.* | .. | adverb |
| *Agric.* | .. | Agriculture |
| *Amer.* | .. | American |
| *Anat.* | .. | Anatomy |
| *Anthrop.* | .. | Anthropology |
| *Bacteriol.* | .. | Bacteriology |
| *Biol.* | .. | Biology |
| *Bot.* | .. | Botany |
| *cf.* | .. | compare |
| *Chem.* | .. | Chemistry |
| *Cyt.* | .. | Cytology |
| *Ecol.* | .. | Ecology |
| e.g. | .. | for example |
| *Elec.* | .. | Electricity |
| *Elec. Engin.* | .. | Electrical Engineering |
| *Embryol.* | .. | Embryology |
| *Eng.* | .. | English |
| esp. | .. | especially |
| *Gen.* | .. | Genetics |
| *Geog.* | .. | Geography |
| *Geol.* | .. | Geology |
| *Ger.* | .. | German |
| *Histol.* | .. | Histology |
| *Hort.* | .. | Horticulture |
| i.e. | .. | that is |
| in comb. | .. | in combination *or* used in combination |
| *Ital.* | .. | Italian |
| *Math.* | .. | Mathematics |
| *Med.* | .. | Medical, Medicine |
| *Met.* | .. | Metallurgy |
| *Meteor.* | .. | Meteorology |
| *Min.* | .. | Mineralogy |

| | | |
|---|---|---|
| *Mycol.* | .. | Mycology |
| *n.* | .. | noun |
| *Ocean.* | .. | Oceanography |
| *Osteol.* | .. | Osteology |
| *Palaeobot.* | .. | Palaeobotany |
| *pa. p.* | .. | past participle |
| *Pathol.* | .. | Pathology |
| *pfx.* | .. | prefix |
| *Photog.* | .. | Photography |
| *Phys.* | .. | Physics |
| *Physiol.* | .. | Physiology |
| *pl.* | .. | plural |
| *Plant Ecol.* | .. | Plant Ecology |
| *Plant Pathol.* | .. | Plant Pathology |
| *Radio.* | .. | Radiology |
| *sing.* | .. | singular |
| *specif.* | .. | specifically |
| *Stat.* | .. | Statistics |
| *suff.* | .. | suffix |
| *syn.* | .. | synonym |
| *Taxon.* | .. | Taxonomy |
| usu. | .. | usually |
| *vb.* | .. | verb |
| *Vet.* | .. | Veterinary science |
| *v.i.* | .. | verb, intransitive |
| *v.t.* | .. | verb, transitive |
| *v. t. & i.* | .. | verb, transitive and intransitive |
| *w.r.t.* | .. | with reference to |
| *Zool.* | .. | Zoology |
| अ.व. | .. | अनेकवचन |
| इ. | .. | इत्यादि |
| न. | .. | नपुंसकलिंग |
| पु. | .. | पुल्लिंग |
| सा. | .. | सामान्य लिंग |
| स्त्री. | .. | स्त्रीलिंग |

## एकत्रितपणे दिलेल्या शब्दांची सूची

1. appendix
2. aqueduct
3. area
4. artery
5. axis
6. bone
7. bursa
8. caecum
9. carina
10. cartilage
11. cavum
12. cervix
13. chorda
14. chorion
15. corpus
16. crista
17. decidua
18. dermis
19. ductus
20. fascia
21. fasciculus
22. fenestra
23. filum
24. flower
25. foramen
26. fossa
27. fovea
28. funiculus
29. ganglion
30. gene
31. gill
32. gland
33. glume
34. gyrus
35. humour
36. joint
37. labia
38. labrum
39. lamina
40. ligament
41. linea
42. liquor
43. macula
44. mediastinum
45. medulla
46. membrane
47. muscle
48. muculus
49. nerve
50. nucleus
51. palate
52. papilla
53. pars
54. placenta
55. plexus
56. plica
57. process
58. ramus
59. rete
60. root
61. scala
62. sinus
63. stele
64. stratum
65. stria
66. substantia
67. sulcus
68. symphysis
69. taenia
70. tapetum
71. tensor
72. tentorium
73. tuber
74. tuberculum
75. tunica
76. valvula
77. vas
78. vein
79. velum
80. vertebra
81. xylem
82. Zona

# जीवशास्त्र परिभाषा कोश

# A

**a–**, *pfx.* (sometimes used in forms an–, *or* ap–) (meaning *not, lacking, without*) अ–, –हीन (as in : achromatic अवर्णी ; asexual अलिंगी ; acarpellous अंडपहीन)

**ab–**, *pfx.* (departing from) अप–

**abactinal**, *adj. Zool.* १ (of or relating to the surface or end opposite to the mouth) अपमुख– २ (as, ambulacral) वीथि–

**abactinally**, *adv.* अपमुखत:

**abaxial**, *adj. Bot. Zool.* अपाक्ष– *cf.* adaxial, अभ्यक्ष–, अभिअक्ष–

**abbreviated**, *adj. Bot.* संक्षिप्त

**abbreviation**, *n.* १ संक्षेप (पु.) २ संक्षेपाक्षर (न.)

**abdomen**, *n. Zool.* उदर (न.)

**abdomen proper**, प्रत्यक्ष उदर

**abdominal**, *adj. Zool.* (relating to the abdomen) उदरीय, उदर–

**abdominal air-sac**, *Zool.* उदर वातकोष

**abdominal appendage**, *Zool.* उदर उपांग

**abdominal cercus**, *Zool.* उदर पुच्छप्रवर्ध

**abdominally**, *adv.* (in the area of the abdomen) उदरदृष्ट्या, उदरत:

**abdominal pleuron**, *Zool.* उदर पार्श्वक

**abdominal sinus**, *Zool.* उदर कुक्षि

**abdominal sternum**, *Zool.* उदर अधरक

**abdominal tergum**, *Zool.* उदर पृष्ठक

**abdominal wall**, *Zool.* उदर भित्ति

**abdomino–**, (in comb.) उदर– (as in : abdomino-thoracic उदर-वक्ष–; abdomino-genital उदर-जननिक)

**abducens**=**abducens nerve**, *Zool.* (*pl.* **abducentes**) (*also* **abducent nerve**) अपवर्तनी (स्त्री.), अपवर्तनी चेता (स्त्री.)

**abducent**, *adj. Zool.* (*of a muscle*—drawing away ; abducting) अपवर्तनी *cf.* adducent

**abduct**, *v.t. Zool.* (to draw away as a limb from a position near or parallel to the median axis) अपवर्तित करणे

**abducting**, *adj. Zool.* अपवर्ती

**abduction**, *n. Zool.* (as, the action of pulling a limb or part away) अपवर्तन (न.)

**abductor**, *n. Zool.* (*pl.* **abductores** *or* **abductors**) (*also* **abductor muscle**) अपवर्ती (पु.), अपवर्ती स्नायु (पु.)

*Abelmoschus esculentus*, *Bot.* अॅबेलमोसचस् एस्क्युलेंटस् (भेंडी)

*Abelmoschus moschatus*, *Bot.* अॅबेलमोसचस् मोसचाटस् (कस्तुर भेंड)

**aberrance**, *n. Bot., Zool.* (quality of being aberrant) विपथचारिता (स्त्री.)

**aberrant**, *adj. Bot.,Zool.* (as, showing same unusual difference of structure, having characteristics not strictly according to the type) विपथी
*n.* विपथी (पु.)

**aberration**, *n. Bot., Zool.* विपथन (न.)

**aberrational**, *adj.* (characterised by aberration) विपथी, विपथनशील, विपथन–

**abhymenial**, *adj. Bot.* अपहायमेनिअमी, अपप्रजननस्तरी

**abiogenesis**, *n. Biol.* (*pl.* abiogeneses) (*also* called **spontaneous generation**) (as, the origination of living organisms from lifeless matter—opposed to *biogenesis*) अजीवजनन (न.)
**abiogenic**, *adj.* (*also* **abiogenetic**) अजीवजनन–
**abiogenic synthesis**, अजीवजनन संश्लेषण
**abiogeny**, *n.* अजीवजनन (न.)
**abiological**, *adj.* १ अजीविक, अजीवीय, अजीव– २ अजीवशास्त्रीय
**abiological interface**, *Zool.* अजीवशास्त्रीय आंतरपृष्ठ
**abiotic**, *adj.* (characterised by the absence of life) अजीविक, अजीवीय, अजीव–
**abiotic origin**, *Zool.* अजीविक उत्पत्ति
**abiotic substance**, *Zool.* अजीविक पदार्थ
**abjection**, *n. Bot., Mycol.* (the discharge or casting as of the spores of certain fungi) अपक्षेपण (न.) *cf.* abstriction
**ablation**, *n. Zool.* उच्छेदन (न.)
**abnormal**, *adj.* (as, deviating from the normal) अपसामान्य
**abnormality**, *n.* अपसामान्यता (स्त्री.)
**ABO group**, *Anat., Zool.* (*also* called **ABO system**) ABO रक्तगट
**abomasum = abomasus**, *n. Zool.* (*pl.* abomasa, *also* abomasi) जठरिका (स्त्री.)
**aboospore**, *n. Bot.* अपफलित अंड (न.)
**aboral**, *adj. Zool.* (opposite to or leading away from or distant from the mouth) अपमुख–
**aborally**, *adv.* अपमुखत:
**abortion**, *n.* १ *Bot.* (as, the state of imperfect or incomplete development) अपूर्ण विकसन (न.) २ *Zool.* गर्भपात (पु.)
**abortive**, *adj.* १ अपूर्ण विकसित २ निष्फळ
**ABO system**, *Anat., Zool.* (*also* called **ABO group**) ABO संस्था (एबीओ रक्तगट संस्था)
*Abroma augusta*, *Bot.* अॅब्रोमा ऑगस्टा (उलट कंबल)
**Abrus precatorius**, *Bot.* अॅब्रस प्रिकेटोरिअस (गुंज)
**abscess**, *n. Med., Zool.* विद्रधि (पु.)
**abscind**, *v.t.* कापून काढणे
**abscission**, *n. Bot.* (*also* **abscision**) (as, the natural separation of flowers, fruits, and leaves from plants by the development and subsequent disorganisation of the separation layer) विलगन (न.)
**abscission layer**, *Bot.* (*also* **absciss layer** *or* **separation layer**) विलागी स्तर
**absciss-phelloid**, *n. Bot.* विलागी सुबेरिनहीन स्तर (पु.)
**absence**, *n.* १ अनुपस्थिति (स्त्री.) २ (want, lack) अभाव (पु.)
**absent**, *adj.* अनुपस्थित
**absolute**, *adj.* १ (as, determined in itself; not relational; independent of arbitrary standards of measurement..etc.) निरपेक्ष २ (simple; pure; free from imperfection) केवल
**absolutely**, *adv.* १ निरपेक्षपणे २ केवल
**absolute transpiration**, *Bot.* (as, a rate of water loss from the plant) निरपेक्ष बाष्पोत्सर्जन
**absorb**, *v.t.* १ शोषणे २ *Chem., Phys.* (to take up as by capillary, osmotic or chemical action—distinguished from *adsorb*) अवशोषण करणे

**absorbability,** *n.* १ *Bot., etc.* शोषणीयता (स्त्री.) २ *Chem., Phys.* अवशोषणीयता (स्त्री.)

**absorbable,** *adj.* १ शोषणीय २ अवशोषणीय

**absorbance,** *n. Bot.* शोषणांक (पु.)

**absorbed,** *adj.* १ शोषित २ अवशोषित

**absorbent,** *adj.* १ *Bot.* शोषक २ *Chem., Phys.* अवशोषी

**absorption,** *n.* १ शोषण (न.) २ *Chem., Phys.* (taking up by capillary, osmotic, chemical or solvent action) अवशोषण (न.)

*cf.* adsorption, अधिशोषण
chemisorption, रासायनिक अधिशोषण
persorption, परिशोषण
physical adsorption, भौतिक शोषण
sorption, शोषण

**absorption band,** *Light, Phys., Zool.* अवशोषण पट्ट

**absorption ratio,** *Bot.* शोषण गुणोत्तर

**absorption spectrum,** *Phys.* अवशोषण पंक्ति (अवशोषण वर्णपंक्ति)

**absorptive,** *adj.* १ शोषी २ अवशोषी

**abstract,** *adj.* (having no reference to a thing or things—opposed to *concrete*) अमूर्त

**abstract community,** *Bot.* अमूर्त समुदाय

**abstricted,** *adj. Bot.* अपमोचित

**abstriction,** *n. Bot.* (as, a general term for the separation of a spore from its stalk) अपमोचन (न.)

*cf.* abjection, अपक्षेपण

**abundance,** *n. Ecol., Plant Ecol.* (as, the relative number of individuals of one kind, as of a species, in area under consideration) बहुलता (स्त्री.), प्रचुरता (स्त्री.)

**abundance density,** *Zool.* बहुलता घनता

**abundant,** *adj.* बहुल, प्रचुर

**abundantly,** *adv.* प्रचुरतेने, विपुल प्रमाणात

*Abutilon indicum*, *Bot.* ॲब्युटिलॉन इंडिकम (मुद्रा पेटारी)

**abysmal** = **abyssal**

**abyss,** *n. Ocean., Zool.* अगाध गर्ता (स्त्री.)

**abyssal,** *adj. Ocean., Zool.* (*also* **abysmal**) अगाध

**abyssalbenthic** = **abyssobenthic**

**abyssalpelagic** = **abyssopelagic**

**abyssal region,** अगाध प्रदेश

**abyssobenthic,** *adj. Ocean., Zool.* (*also* **abyssalbenthic**) अगाध जलीय

**abyssopelagic,** *adj. Ocean., Zool.* (*also* **abyssalpelagic**) अगाध जलीय

**abyssopelagic forms,** *Zool.* अगाध जलीय प्राणी

**Acacia,** *n. Bot.* ॲकेशिआ (पु.) (ॲकेशिआ प्रजाति)

*Acacia arabica*, *Bot.* ॲकेशिआ अरेबिका

*Acacia auriculaeformis*, *Bot.* ॲकेशिआ ऑरीक्युलिफॉर्मिस

*Acacia catechu*, *Bot.* ॲकेशिआ कॅटेच्यु (खैर)

*Acacia farnesiana*, *Bot.* ॲकेशिआ फर्निसिआना (देवबाभूळ)

*Acacia leucophloea*, *Bot.* ॲकेशिआ ल्युकोफ्लोआ (हिवर)

*Acacia nelotica*, *Bot.* ॲकेशिआ नेलोटिका (बाभूळ)

*Acacia rugata*, *Bot.* ॲकेशिआ रुगाटा (शिकेकाई)

*Acacia suma*, *Bot.* ॲकेशिआ सुमा (सोनखैर)

**Acaena,** *n. Bot.* ॲसीना (पु.)

*Acalypha*, *n. Bot.* ॲकॅलिफा (पु.)

*Acalypha hispida*, *Bot.* ॲकॅलिफा हिसपिडा (खलिफा)

*Acalypha indica*, *Bot.* ॲकॅलिफा इंडिका (कुर्पा, खोकली)

**acanaceous**, *adj. Bot.* (prickly) काटेरी, कंटकी

*Acanella*, *n. Zool.* ॲकॅनेला (पु.) (ॲकॅनेला प्रजाति)

**acanth— = acantho—**

**acantha**, *n.* १ *Bot.* (prickle or spine) कंट (पु.) २ *Zool.* (a spine or spinous fin) कंटक (पु.)

**Acanthaceae**, *n. Bot.* ॲकन्थेसी (स्त्री.) (ॲकन्थेसी कुल)

**Acantharia**, *n. Zool.* ॲकॅन्थॅरिआ (पु.)

**Acanthias**, *n. Zool.* ॲकॅन्थिआस (न.)

**acantho—**, (in comb.) कंट—, कंटक—

**Acanthobdellida**, *n. Zool.* ॲकॅन्थोब्डेलिडा (पु.) (ॲकॅन्थोब्डेलिडा गण)

**acanthocarpous**, *adj. Bot.* कंटकफळी, काटेरी फळयुक्त

**Acanthocephala**, *n. Zool.* ॲकॅन्थोसेफॅला (पु.)

**Acanthochiton**, *n. Zool.* ॲकॅन्थोकायटन (न.)

**acanthocladous**, *adj. Bot.* (spiny-branched) कंटशाखित

**Acanthodidae**, *n. Zool.* ॲकॅन्थोडिडी (स्त्री.)

**Acanthodii**, *n. Zool.* ॲकॅन्थोडी (स्त्री.)

**Acanthometridae**, *n. Zool.* ॲकॅन्थोमेट्रिडी (स्त्री.)

**acar— = acari— = acaro—**

**Acarapis**, *n. Zool.* ॲकॅरपिस (न.) (ॲकॅरपिस प्रजाति)

**acariform**, *adj. Zool.* वरूथिरूप

**Acarina**, *n. Zool.* ॲकॅरिना (पु.) (ॲकॅरिना गण)

**acaro—**, (in comb.) वरूथि—

**acarodomatium**, *n. Bot.* (a hollow or other protective structure formed by some plants which harbour mites and appear to live in symbiosis with them) वरूथिस्थान (न.) (वरूथिकीटक आश्रय-स्थान)

**acaroid**, *adj. Zool.* वरूथिसम

**acarologist**, *n.* ॲकॅरिनाशास्त्रज्ञ (सा.), वरूथिशास्त्रज्ञ (सा.)

**acarology**, *n.* (a branch of zoology that deals with mites and ticks) ॲकॅरिना-शास्त्र (न.), वरूथिशास्त्र (न.)

**acarophily**, *n. Bot.* (*also* **acarophytism**) वरूथि-सहजीवन (न.) (वरूथी आणि पादप यांचे सहजीवन)

**acarpelous**, *adj. Bot.* (*also* **acarpellous**) अंडपहीन (अंडप = carpel)

**acarpous**, *adj. Bot.* (not producing fruit) फलहीन

**acarpy**, *n. Bot.* अंडपहीनता (स्त्री.)

**Acarus**, *n. Zool.* ॲकॅरस (पु.) (ॲकॅरस प्रजाति)

*Acarus*, *n. Zool.* (*pl.* **acari**) (mite) वरूथि (पु.)

**acaudate**, *adj. Bot.* (*also* **acaudal**) (without a tail) अपुच्छी

**acaulescence**, *n. Bot.* (state of being acaulescent) अस्तंभता (स्त्री.)

**acaulescent = acauline**, *adj. Bot.* (*also* **acaulose**) (stemless—opposed to *caulescent*) अस्तंभी

**acaulis**, *n. Bot.* अस्तंभ (पु.)
*adj.* अस्तंभ—

**acaulose = acaulescent**

**Acavidae**, *n. Zool.* ॲकॅव्हिडी (स्त्री.)

**accelerate**, *v.t. & i.* (as, to hasten the progress or development of) त्वरण करणे, त्वरण होणे

**accelerated**, *adj.* त्वरणित

**acceleration**, *n. Zool.* त्वरण (न.)

**accelerator**, *n.* १ *Bot.* (as, any substance which increases the efficiency of an enzyme) त्वरक (पु.) २ *Zool.* (any muscle or nerve which increases the rate of action) त्वरक (पु.)

**accentuate**, *v.t.* (as, to increase in degree; to intensify) तीव्र करणे

**accentuation**, *n.* तीव्रन (न.)

**accept**, *v.t.* ग्रहण करणे, स्वीकार करणे

**acceptor**, *n. Bot., Zool.* ग्राही (पु.), स्वीकारी (पु.)

**accessary** = **accessory**

**accessorius**, *n.* (*pl.* **accessorii**) *Zool.* १ (as, a muscle that supplements the action of another muscle) सहायक स्नायु (पु.), उपस्नायु (पु.) २ (as, accessory nerve) सहायक चेता (स्त्री.)

**accessory**, *n.* १ *Bot.* (as, an additional member beyond the normal) अतिरिक्त (अंग, भाग, वगैरे) २ *Zool.* (*also* **accessary**) (as, accessory nerve) सहायक चेता (स्त्री.) *adj.* १ सहायक २ (additional) अतिरिक्त

**accessory acclimatisation**, *Zool.* सहायक परिअनुकूलन

**accessory body**, *Zool.* सहायक पिंड

**accessory bud**, *Bot.* (a bud additional to a normal axillary bud) अतिरिक्त कलिका, उपकलिका (स्त्री.)

**accessory cell**, *Bot.* (*also* called **subsidiary cell**) सहायक पेशी

**accessory character**, *Bot., Zool.* सहायक लक्षण, सहायक वैशिष्टच

**accessory chromosome**, *Cyt.* (*also* called **sex chromosome**) अतिरिक्त गुणसूत्र

**accessory duct**, *Zool.* सहायक वाहिनी

**accessory duct of Santorini**, *Zool.* सँटोरिनी सहायक वाहिनी

**accessory factor**, *Zool.* अतिरिक्त कारक

**accessory fructification**, *Bot.* सहायक फलन

**accessory fruit** = **pseudocarp**

**accessory heart**, *Zool.* अतिरिक्त हृदय

**accessory multiplication**, *Bot.* (*also* **accessory reproduction**) (any asexual reproductive process) सहायक गुणन, सहायक प्रजनन

**accessory pancreatic duct** = **duct of Santorini**

**accessory pulsatory organs**, *Zool.* सहायक स्पंदन इंद्रिये

**accessory reproduction** = **accessory multiplication**

**accessory respiratory organ**, *Zool.* अतिरिक्त श्वसनेंद्रिय

**accessory scale**, *Zool.* अतिरिक्त शल्क, अतिरिक्त खवला

**accessory shoot**, *Bot.* अतिरिक्त प्ररोह

**accessory spore**, *Bot.* (an asexual spore; also a conidium differing from the normal type) सहायक बीजाणु

**Accipitridae**, *n. Zool.* अॅक्सिपिट्रिडी (स्त्री.) (अॅक्सिपिट्रिडी कुल)

**acclimatation** = **acclimatisation**

**acclimate** = **acclimatise**

**acclimation**, *n. Biol.* (the usu. physiological adjustment that an individual organism exhibits to a change in its immediate environment) वातावरणात रुळणे (न.)

**acclimatisation**, *n.* (*also* **acclimatation**) १ (as, a process or result of acclimatising) वातावरणात रुळणे (न.) २ *Ecol.* (adaptation or increased tolerance of a species

to a changed environment in the course of several generations) परिअनुकूलन (न.) (पर्यावरणी अनुकूलन)

**acclimatise,** *v.t.* & *i.* (*also* **acclimate**) १ वातावरणात रुळणे २ परिअनुकूलन होणे

**acclimatised,** *adj.* १ वातावरणात रुळलेला २ परिअनुकूलित

**accommodate,** *v.t.* (to adjust, to make suitable) समायोजन करणे *cf.* adapt

**accommodating,** *adj.* समायोजी

**accommodation,** *n.* १ *Bot.* (the capacity of a plant to adjust itself to new conditions of life) समायोजन (न.) २ *Zool.* (as, of an eye) समायोजन (न.)

**accommodation reflex,** *Zool.* समायोजन प्रतिक्षेप

**accompanying,** *adj.* सहगामी

**accrescence,** *n. Bot.* वर्धिष्णुता (स्त्री.)

**accrescent,** *adj. Bot.* १ (growing larger after flowering—used esp. of a calyx) वर्धिष्णु २ (*said of a leaf*) वर्धी अपाती *cf.* marcescent, अवर्धी अपाती persistent, अपाती, स्थायी अपाती

**accretion,** *n. Zool.* (growth by external addition of new matter) उपवृद्धि (स्त्री.)

**acculeate,** *adj. Bot.* निसंदकंटकी

**accumbent,** *adj.* १ *Bot.* (lying against) प्रतिस्थित २ *Zool.* प्रतिशयित

**accumulate,** *v.t.& i.* संचय करणे, साचवणे, संचय होणे, साचणे

**accumulated,** *adj.* संचित, साचलेला

**accumulation,** *n.* संचय (पु.), संचयन (न.), साचणे (न.)

**accumulative,** *adj.* संचयी

**acellular,** *adj. Biol.* (noncellular) अपेशीय, अपेशिक

**acenapthene,** *n. Chem.* ॲसिनॅप्थिन (न.)

**acentric,** *adj.* अकेंद्री, अकेंद्र–

**acentric chromosome,** अकेंद्री गुणसूत्र

**acentrous,** *adj. Zool.* (as, lacking vertebral centra) (कशेरु) कायहीन

**acephalo-,** *Zool.* (in comb.) शीर्ष······हीनता, शिरो····हीनता (as in : acephalopodia शीर्षपादहीनता; acephalothoracia शिरोवक्षहीनता)

**acephalous,** *adj.* १ *Bot.* (*said of a style*) अशीर्षी २ *Zool.* (without head or headlike structure; showing no appreciable degree of cephalisation) अशीर्षी

**acerate** = **acerose,** *adj.* सूच्याकृति–

**Acerentomon,** *n. Zool.* ॲसिरेंटोमॉन (पु.) (ॲसिरेंटोमॉन प्रजाति)

**acervate,** *adj. Bot.* (growing in heaps or closely compacted clusters) समूहित, राशित (as in : acervate fungous sporophores समूहित कवक बीजाणुधर)

**acervation,** *n.* समूहन (न.), राशीयन (न.)

**acervuline,** *adj. Bot., Zool.* (heaped) समूहित, राशिवत

**acervulus,** *n.* (*pl.* **acervuli**) १ *Bot.* ॲसरव्हयुलस (पु.) २ *Zool.* (*also* called **corpora arenacea**) (*also* **acervulus cerebri: brain-sand**) मस्तिष्क वालुका (स्त्री.)

**acetabuliform,** *adj. Bot.* (saucer-shaped) शरावाकार (शराव=saucer), बशीच्या आकाराचा

**acetabulum,** *n.* (*pl.* **acetabula** *or* **acetabulums**) १ *Osteol.* (as, a cupshaped socket in the hip bone) उलूखल (न.) २ *Zool.* (as, sucker—in Cestoda) चूषक (पु.)

**acetaldehyde,** *n. Chem.* ॲसिटाल्डिहाइड (न.)

**acetic acid,** *Chem.* ॲसेटिक आम्ल

**acetocarmine**, *n. Chem.*, ॲसेटोकार्माइन (न.)
**acetyl**, *n. Chem.* ॲसिटिल (न.)
**acetylate**, *v.t.* & *i. Chem.* (*also* acetylise) ॲसिटिलन करणे, ॲसिटिलन होणे
**acetylated**, *adj.* ॲसिटिलित
**acetylation**, *n. Chem.* ॲसिटिलन (न.)
**acetylcholine**, *n. Chem.* ॲसिटिल कोलीन (न.)
**acetyl coenzyme A**, *Chem., Biol.* (*also* acetyl CoA) ॲसिटिल कोएंझाइम A
**acetylise** = acetylate
**–aceus**, (*Latin—suff.* aceous, meaning like) –आभ, –वत्
**achaenocarp** = achene
**Achatinellidae**, *n. Zool.* ॲकॅटिनेलिडी (स्त्री.)
**ache**, *n.* शूळ (पु.), दुखी (स्त्री.)
**achene**, *n. Bot.* (*also* akene *or* achaenocarp) ॲकीन (न.), चर्मिलक (न.)
**achenial**, *adj. Bot.* (said of fruits—as, a class ; indehiscent one-seeded) एकबीजा-स्फोटी
**achenial fruit**, *Bot.* एकबीजास्फोटी फल
**achiasmatic**, *adj. Zool.* अव्यत्यासिका–
**achiasmatic lack**, *Zool.* अव्यत्यासिका न्यूनता
**achlamydate**, *adj. Zool.* (without a mantle) अकंचुक (कंचुक = mantle ; robe)
**Achlamydeae**, *n. Zool.* अक्लॅमायडी (स्त्री.)
**achlamydeous**, *adj. Bot.* (without perianth—opposed to *chlamydeous*) अपरि-दलपुंजी
**achlamydospore**, *n. Bot.* अकंचुक बीजाणु (पु.), अक्लॅमायडी बीजाणु (पु.)
*Achras zapota*, *Bot.* एचरस झॅपोटा (चिकु)
**achro–** = achroo–
**achromatic**, *adj. Biol.* (not readily coloured by usual staining agents) अवर्णी
**achromatically**, *adv.* अवर्णीदृष्ट्या
**achromatic figure**, *Cyt.*, अवर्णी आकृति
**achromaticity**, *n.* अवर्णीयता (स्त्री.)
**achromatic spindle**, *Cyt.* अवर्णी तर्कु
**achromatin**, *n. Cyt.* (opposed to *chromatin*) क्रोमॅटिनहीन (पेशी, केंद्रक, इ.), अक्रोमॅटिन (न.)
**achromatinic**, *adj.* अक्रोमॅटिनी
**achromatism**, *n.* अवर्णता (स्त्री.)
**achromatopsia**, *n. Zool.* (colour-blindness) वर्णांधता (स्त्री.)
**achroo–**, (in comb.) (*also* achro) (colourless) अवर्ण–
**achroous**, *adj. Bot.* रंगहीन
**Achyranthes**, *n. Bot.* एचिरॅन्थिस (न.) (एचिरॅन्थिस प्रजाति)
*Achyranthus aspera*, *Bot.* एचिरँथस असपेरा (आघाडा)
**acicula**, *n.* (*pl.* aciculae) (needlelike spine, bristle, etc.) सूचिका (स्त्री.)
**acicular**, *adj. Bot.* (needle-shaped, slender and pointed) सूच्याकृति–, सूचि– (as in : acicular leaf सूच्याकृति पर्ण, सूचिपर्ण)
**aciculate**, *adj. Bot.* (having fine scratches on the surface) सूचिखूरित
**aciculiform**, *adj. Bot.* सूचिरूप
**aciculum**, *n. Zool.* (*pl.* acicula) (as, a needlelike spine or bristle, etc.) सूचिका (स्त्री.)
**acid**, *n. Chem.* आम्ल (न.)
*adj.* १ आम्ल– २ *Geol.* अधिसिलिक
**acid dye**, *Chem.* आम्ल रंजक
**acid fermentation**, *Chem.* आम्ल किण्वन
**acid-forming**, *adj.* आम्लकारी

**acid humus**, *Bot.* आम्ल कुथितमृदा

**acidic**, *adj. Chem.* १ आम्लधर्मी २ (as, acid-forming) आम्लकारी *Geol.* ३ अधिसिलिक

**acidic sap**, *Bot.* आम्लधर्मी रस

**acidiferous**, *adj.* (containing or yielding an acid) आम्लयुक्त, आम्लकारी

**acidific**, *adj.* आम्लकारी

**acidification**, *n.* (act or process of acidifying) आम्लन (न.)

**acidify**, *v.t.* & *i.* (to convert into acid; to become acid) आम्लन करणे, आम्लन होणे

**acidifying**, *adj.* आम्लकारी

**acidimeter**, *n. Chem.* (*also* acidometer) आम्लमापी (पु.)

**acidimetric**, *adj.* आम्लमितीय

**acidimetry**, *n. Chem.* आम्लमिति (स्त्री.)

**acidity**, *n. Chem.* आम्लता (स्त्री.)

**acidogenic**, *adj.* (acid-forming) आम्लकारी (as in: acidogenic bacteria आम्लकारी जीवाणू)

**acidometer** = **acidimeter**

**acidophil** = **acidophile**, *n. Zool.* (an acidophilic substance, tissue, etc.) आम्लरागी (पु.)

**acidophilic**, *adj.* (*also* **acidophilous**) (staining readily with acid stains; preferring or thriving in relatively acid environment) आम्लरागी

**acidophil WBC**, *Zool.* आम्लरागी श्वेतपेशी

**acid plant**, *Bot.* आम्ली वनस्पति, आम्ली पादप

**acies**, *n. Bot.* (*Latin*—meaning edge) कडा (स्त्री.)

**acinaceous**, *adj. Bot.* १ खवलेदार २ (containing seeds or kernels) दाणेदार

**acinaciform**, *adj. Bot.* जंबियाकार (as in: acinaciform leaf जंबियाकार पान)

**acinar**, *adj. Zool.* (of or relating to acinus) कोष्ठक–

**acinar cell**, *Zool.* कोष्ठक पेशी

**Acineta**, *n. Zool.* ॲसिनेटा (पु.)

**Acinetaria**, *n. Zool.* ॲसिनेटेरिआ (पु.)

**acinus**, *n. Zool.* कोष्ठक (न.)

**Acipenser**, *n. Zool.* ॲसिपेन्सर (न.)

**Acipenseroidei**, *n. Zool.* ॲसिपेन्सरॉइडी (स्त्री.)

**Acmaeidae**, *n. Zool.* ॲक्मिडी (स्त्री.)

**acme**, *n. Biol.* (a period of maximum vigour of an individual, race or species) परमओज काल (पु.)

**Acnidaria**, *n. Zool.* ॲक्निडेरिआ (पु.)

**Acnidosporidia**, *n. Zool.* ॲक्निडोस्पोरिडिआ (पु.)

**Acochlidiacea**, *n. Zool.* ॲकोक्लिडिएसिआ (पु.)

**Acochlidiidae**, *n. Zool.* ॲकोक्लिडीडी (स्त्री.)

**Acoela**, *n. Zool.* असीला (पु.)

**Acoelomata**, *n. Zool.* असीलोमॅटा (पु.)

**acoelomate**, *adj. Zool.* देहगुहाहीन

**acoelous**, *adj.* (lacking a gut cavity) अगर्ती

**acone**, *adj. Zool.* (said of compound eyes in which ommatidia contain no cone of any kind) अशंकुक (as in: acone eyes अशंकुक नेत्र)

**aconitine**, *n. Chem.* (a white crystalline intensely poisonous alkaloid from the root and leaves of aconite) ॲकोनिटीन (न.)

**aconitrase**, *n. Bot.* (an enzyme) ॲकोनिट्रेज (न.)

*Aconitum*, *n. Bot.* ॲकोनिटम (न.)

*Aconitum ferox*, *Bot.* ॲकोनिटम फेरॉक्स (बचनाग)

**acontium**, *n.* (*pl.* acontia) १ *Bot.* (a plan of the genus aconitum) प्रविषी (पु.) २ *Zool.* विषतंतु (न.)

**acorn-shell,** *n. Zool.* शंकुकवची (पु.)

*Acorus calamus, Bot.* ॲकोरस कॅलॅमस (वेखंड)

**acotyledon,** *n. Bot.* (a plant without cotyledons) अबीजपत्री (पु.) (पादप)

**acotyledonous,** *adj. Bot.* अबीजपत्री

**acoustic,** *adj.* १ (of relating to or affecting the organs of hearing) श्रवणविषयक, श्रवण— २ (of or relating to sound) ध्वनिविषयक, ध्वनि— ३ (pertaining to the science of sound) ध्वनिकीय

**acoustic area = acoustic centre,** *Zool.* श्रवण केंद्र

**acoustico-facial,** *adj. Zool.* श्रवणास्यी

**acoustico-lateral,** *adj. Zool.* श्रवण-पार्श्विक—

**acoustico-lateral centre,** *Zool.* श्रवण-पार्श्विक केंद्र

**acoustico-lateral system,** *Zool.* (*also* **lateral line organs**) पार्श्व-श्रवण संस्था

**acoustic orientation,** *Zool.* श्रवण दिशा-देशन

**acoustic spot,** *Zool.* श्रवण बिंदु

**acquired,** *adj.* उपार्जित

**acquired character,** उपार्जित लक्षण, उपार्जित वैशिष्ट्य

**acquired variation,** उपार्जित विभेद, उपार्जित बदल

**acrandrous,** *adj. Bot.* (having antheridia at the top of the stem) अग्रस्थ-पुंधानी—

**acrania,** *n. Zool.* (congenital, partial or total absence of skull) करोटीहीनता (स्त्री.)

**Acrania,** *n. Zool.* ॲक्रेनिआ (पु.)

**Acraniata,** *n. Zool.* (*syn. of* Acrania) ॲक्रेनिआटा (पु.)

**Acrasida,** *n. Zool.* ॲक्रेसिडा (पु.)

**Acraspeda,** *n. Zool.* ॲक्रास्पेडा (पु.)

**acridine,** *n. Chem.* ॲक्रीडीन (न.)

**acro—,** *pfx.* अग्र—

**acrocarpous,** *adj. Bot.* (*also* **acrocarpic**) अग्रफलिक

*cf.* pleurocarpous, पार्श्वफलिक

**acrocentric,** *adj. Bot., Zool.* अग्रकेंद्री, अग्रकेंद्रिक

**acrocentric chromosome,** *Zool.* अग्रकेंद्री गुणसूत्र

**acrocephaly** *n. Zool.* शंकुशीर्षता (स्त्री.)

**acrochordal,** *adj.* ललाट—

*n.* (in birds, an unpaired cartilage of the chondrocranium) ललाटकास्थि (स्त्री.)

**acrocoracoid,** *n. Zool.* अग्रअंसतुंड (न.)

**acrocyst,** *n. Zool.* अग्रपुटी (स्त्री.)

**acrodont,** *adj. Zool.* १ (said of teeth which are fused to the bone bearing them) कूटदंत— २ (having such teeth) कूटदंती

*n.* (an acrodont animal) कूटदंती (पु.)

**acrodrome = acrodromous,** *adj. Bot.* (used of a form of venation in which the principal veins terminate at the leaf tip) अग्रान्तगामी

**acrogenous,** *adj. Bot.* (increasing by growth from the summit or apex) अग्रवर्धी

**acrogynous,** *adj. Bot.* (having one or more archegonia at the tip of the axis) अग्रजाय

**acrogyny,** *n. Bot.* अग्रजायता (स्त्री.)

**acromegalia = acromegaly,** *n. Zool.* अतिकायता (स्त्री.)

**acromial,** *adj. Zool.* (of or relating to the acromion) अंसकूट—

**acromio—,** (in comb.) अंसकूट—

**acromioclavicular,** *adj. Zool.* अंसकूट-जत्रुक—

**acromiocoracoid,** *n. Zool.* अंसकूट-अंसतुंड (न.)

**acromiohumeral,** *adj. Zool.* अंसकूट-प्रगंड—

**acromion**, *n. Zool.* (*also* called **acromion process**) अंसकूट (पु.) (अंसकूट प्रवर्ध)

**acromioscapular**, *adj. Zool.* अंसकूट-अंस-फलक–

**acromiothoracic**, *adj. Zool.* अंसकूट-वक्ष–

**Acromyodi**, *n. Zool.* ॲक्रोमायोडी (स्त्री.)

**acron**, *n. Zool.* (the unsegmented preoral part of the body of a segmented animal) मुखपूर्व (न.)

**acroneme**, *n. Zool.* अग्रतंतु (पु.)

**acroneme flagellum**, *Zool.* अग्रतंतु कशाभिका

**acronychius**, *adj.* (*Latin*—curved like a claw) नखरवक्र, आकडी

**acropetal**, *adj. Bot.* (*also* **basifugal**) (in the direction of apex) अभिअग्र–, अभ्यग्र– *cf.* basipetal, अभितल–
centrifugal, अपकेंद्री, अपकेंद्र–
centripetal, अभिकेंद्री, अभिकेंद्र–

**acropetal inflorescence**, *Bot.* अभिअग्र पुष्पविन्यास

**acropetal succession**, *Bot.* अभिअग्र क्रम

**acrophytium**, *n. Bot.* प्रशैलवास (पु.) (शैलपादप समावास)

**acropleurogenous**, *adj. Bot.* (borne at the tips and along the sides) अग्रपार्श्वस्थ

**acropodium**, *n. Zool.* हस्तपादाग्र (न.)

**acroscopic**, *adj. Bot.* (facing or on the side towards apex) अग्रोन्मुख

**acrosome**, *n.* १ *Bot.* अग्रकाय (पु.) २ *Zool.* शुक्राग्र (न.) (शुक्रपेशी अग्र)

**acrosome granule**, *Zool.* शुक्राग्र कणी

**acrosome vesicle**, *Zool.* शुक्राग्र पुटिका

**acrospire**, *n. Bot.* (plumule) प्रांकुर (पु.)

**acrospore**, *n. Bot.* (a spore borne at the extremity of the sporophore) अग्रबीजाणु (पु.)

**acrosternite**, *n. Zool.* अग्रअधरक (पु.)

**acrostichal bristle**, *Zool.* मध्यवक्ष शूक

**acrostichoid sorus**, *Bot.* संमीलित बीजाणुपुंज

**acrotergite**, *n. Zool.* अग्रपृष्ठखंड (पु.)

**Acrothoracica**, *n. Zool.* ॲक्रोथोरॅसिका (पु.)

**acrotrophic**, *adj. Zool.* (having nutritive cells grouped at the apex of the follicular tube) अग्रपोषी

**acrotrophic egg tube**, *Zool.* अग्रपोषी अंडनलिका

**acrotrophic ovariole**, *Zool.* अग्रपोषी अंडाशयक

**Actaeonidae**, *n. Zool.* ॲक्टिओनिडी (स्त्री.)

**actin–**, (in comb.) ॲक्टिन–

**actinal** = **oral**

**actin filament**, *Zool.* ॲक्टिन तंतु

**Actinia**, *n. Zool.* ॲक्टिनिआ (पु.)

**Actiniaria**, *n. Zool.* ॲक्टिनिआरिआ (पु.)

**Actinidia**, *n. Zool.* ॲक्टिनिडिआ (पु.)

**Actinistia**, *n. Zool.* ॲक्टिनिस्टिआ (पु.)

**actinobiology**, *n.* प्रारणजीवशास्त्र (न.)

*Actinodaphne angustifolia*. *Bot.* ॲक्टिनोडाफ्ने अंगुस्तिफोलिआ (पिसा)

**actinodrome** = **actinodromous**, *adj. Bot.* (having the main veins of a leaf radiating from the tip of the petiole) अग्रत्रिज्या विकीर्ण

**actinomorphic** = **actionomorphous**, *adj. Bot., Zool.* (radially symmetrical) त्रिज्या सममित

**actinomycin**, *n. Zool.* ॲक्टिनोमायसिन (न.)

**actinomycosis**, *n. Bot., Zool.* (infection with actinomycetes) ॲक्टिनोरोग (पु.)

**Actinomyxidia**, *n. Zool.* ॲक्टिनोमिक्सिडिआ (पु.)

**actinophage**, *n. Bot.* (a phage that develops in and lyses an actinomycete) ॲक्टिनीभक्षी (पु.)

**actinophore**, *n. Zool.* (*also* actinost, pterygophore) पक्षास्थि (स्त्री.), पक्षाभ अर (पु.)

**Actinophrys**, *n. Zool.* ॲक्टिनोफ्रिस (न.)

**Actinopoda**, *n. Zool.* ॲक्टिनोपोडा (पु.)

**actinopodium**, *n. Zool.* ॲक्टिनोपाद (पु.), अक्षपाद (पु.)

*Actinopteris dichotoma*, *Bot.* ॲक्टिनोप्टेरिस डायकोटोमा (मोरपंखी)

**Actinopterygii**, *n. Zool.* ॲक्टिनोप्टेरीजी (स्त्री.)

**Actinosphaerium**, *n. Zool.* ॲक्टिनोस्फिरिअम (न.)

**actinost** = actinophore

**actinostele**, *n. Bot.* अरिल रंभ (पु.)

**actinostome**, *n. Zool.* (radially symmetrical mouth-opening) अरमुख (न.)

**actinotrocha**, *n. Zool.* (a free swimming larva) ॲक्टिनोट्रोका (पु.)

**Actinozoa**, *n. Zool.* (*syn. cf* Anthozoa) ॲक्टिनोझोआ (पु.)

**action**, *n.* क्रिया (स्त्री.)

**action potential**, *Zool.* क्रिया विभव

**action spectrum**, *Zool.* (graphic representation of a physiological reaction) क्रिया वर्णाली

**Actipylea**, *n. Zool.* ॲक्टिपायलिआ (पु.)

**actium**, *n. Bot.* (a rocky sea-shore formation) प्रशिलावास (पु.) (समुद्रतट शिला पादप समावास)

**activate**, *v.t. & i.* सक्रियित करणे, सक्रियित होणे

**activated**, *adj.* सक्रियित

**activated sludge**, *Bot.*, *Zool.* सक्रियित अवपंक

**activation**, *n. Bot.*, *Zool.* सक्रियण (न.), सक्रियित होणे (न.), सक्रियित करणे (न.)

**activation by light**, *Bot.* (the changing of a complex chemical into a different one by light energy during photosynthesis) प्रकाश सक्रियण

**activation enzyme**, *Zool.* त्वरक विकर, सक्रियक विकर

**activator**, *n.* १ (one that activates) सक्रियक (पु.), सक्रियकारी (पु.) २ (as, an accelerator) त्वरणित्र (न.)

**activator gene**, *Zool.* सक्रियकारी जीन

**active**, *adj.* सक्रिय, क्रियाशील

**active absorption**, *Bot.* क्रियाशील शोषण

**active transport**, *Bot.*, *Zool.* सक्रिय परिवहन

**activity**, *n.* १ क्रिया (स्त्री.) २ सक्रियता (स्त्री.), क्रियाशीलता (स्त्री.)

**activity rhythm**, *Zool.* (*also* called **circadian rhythm**) सक्रियता आवर्तन (मोहिनी आवर्तन)

**actomyosin**, *n. Zool.* ॲक्टोमायोसिन (न.)

**acuity**, *n.* तीक्ष्णता (स्त्री.)

**aculeate**, *adj. Bot.* (bearing prickles or covered with needle-like outgrowths) सशूल–

**aculeolate**, *adj. Bot.* (having somewhat spine-like processes) सशूलक–

**acuminate**, *adj. Bot.* (tapering to a slender point) लंबाग्र–

**acutangular**, *adj. Bot.* लघुकोनी

**acute**, *adj.* तीक्ष्ण, तीव्र

**acuti–**, (in comb.) (sharp, pointed) तीक्ष्ण

**acutifoliate**, *adj. Bot.* तीक्ष्णपर्णी

**acyclic**, *adj. Bot.* (said of floral parts, not in whorls but in spirals) अचक्रीय

**ad–**, *pfx.* अनु–, आ–

**Adam's apple**, *Anat.*, *Zool.* कंठमणि (पु.)

**Adamsia,** *n. Zool.* ॲडॅम्सिआ (पु.)
*Adansonia digitata*, *Bot.* ॲडान्सोनिआ डिजिटाटा (गोरखचिंच)
**Adapedonta,** *n. Zool.* ॲडापेडॉन्टा (पु.)
**adapt,** *v.t.* & *i.* (to make fit or suitable) अनुकूलन करणे, अनुकूलन होणे
*cf.* accommodate, समायोजन करणे
adjust, अनुयोजन करणे
conform, समनुरूप करणे, समनुरूप असणे, अभिसंगत करणे, अभिसंगत असणे
reconcile, मेळ घालणे, मेळ बसवणे
**adaptability,** *n.* अनुकूलनीयता (स्त्री.)
**adaptable,** *adj.* अनुकूलनीय
**adaptation,** *n.* अनुकूलन (न.)
**adapted,** *adj.* अनुकूलित
**adapted race,** *Bot., Zool.* अनुकूलित वंश
**adapter,** *n.* (*also* **adaptor**) अनुकूलक (पु.)
**adapter compound,** *Chem.* अनुकूलक संयुग
**adaptive,** *adj.* अनुकूल, अनुकूलक, अनुकूली
**adaptive character,** *Zool.* अनुकूलक अभिलक्षण
**adaptive enzyme,** *Bot.* अनुकूलक विकर
**adaptive niche,** *Zool.* अनुकूली सुस्थान
**adaptive peak,** *Zool.* अनुकूल शिखर
**adaptive radiation,** *Zool.* अनुकूल विकिरण
**adaptive resemblance,** *Zool.* अनुकूल सादृश्य
**adaptive value,** *Zool.* अनुकूली मूल्य
**adaptive variation,** *Zool.* अनुकूली विभेद
**adaptor** = **adapter**
**adaxial,** *adj. Bot., Zool.* (situated on the same side as or facing the axis of organ or organism) अभ्यक्ष–, अभिअक्ष *cf.* abaxial
**adcrustation,** *n. Bot.* (the deposition of a substance on a cell wall) अनुपर्पटन (न.), अनुनिक्षेपण (न.)
**additive,** *adj.* समावेशी
**additive fixative,** *Bot.* (a fixative that combines chemically with the protein of the material being preserved) समावेशी स्थिरकारी
**additive scale,** *Bot.* समावेशी मापन
**adducent,** *adj. Zool.* (as, adducting) अभिवर्तनी
*cf.* abducent, अपवर्तनी
**adduct,** *v.t. Zool.* (to draw as a limb toward or past the median axis of the body; also to bring together as similar parts) अभिवर्तित करणे
**adducting,** *adj. Zool.* अभिवर्ती
**adduction,** *n. Zool.* (the action of adducting or the condition of being adducted) अभिवर्तन (न.)
**adductor,** *n. Zool.* (*also* **adductor muscle**) अभिवर्तनी (पु.), अभिवर्तनी स्नायु (पु.)
**adelochord,** *n. Zool.* लीनरज्जु (पु.)
**Adelochorda,** *n. Zool.* (*syn. of* **Hemichordata**) ॲडेलोकॉर्डा (पु.)
**Adelochordata,** *n. Zool.* (*syn. of* **Hemichordata**) ॲडेलोकॉर्डाटा (पु.)
**Adelospondyli,** *n. Zool.* (*syn. of* **Microsauria**) ॲडेलोस्पॉंडिली (स्त्री.)
**adelphogamy,** *n. Bot.* (union between a vegetative mother cell and one of its daughter cell) जनकजन्य संयोग (पु.)
**adelphous,** *adj. Bot.* (said of an androecium with the filaments of the stamens partly or wholly united) वृंतसंघी
*cf.* diadelphous, द्विवृंतसंघी
monadelphous, एकवृंतसंघी
polyadelphous, बहुवृंतसंघी
triadelphous, त्रिवृंतसंघी
**adelphy,** *n. Bot.* वृंतसंघिता (स्त्री.)
**aden–,** *pfx.* ग्रंथि–
*Adenanthera povonia*, *Bot.* ॲडेनन्थेरा पॉव्होनिआ (ढोरगुंज)

